मा.उच्च न्यायालय,मुंबई खंडपीठ नागपूरच्या रिट याचिका क्र.२८५/९९ मधील न्याय निर्णयाच्या अनुषंगाने फौजदारी प्रक्रिया संहिता कलम क्र.१०७,१०९,११०,११६,११७ चे क्षुल्लक गुन्हयामध्ये कारागृहात बंदीस्त असलेल्या गुन्हेगारांना सोडण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
परिपत्रक क्रमांक-एमआयएस-०१९९/२४(७४)/पीआरएस-२.
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२. दिनांक:-२८ जून, २०००.

**प्रस्तावना :-** मा.उच्च न्यायालय,मुंबई खंडपीठ नागपूरच्या रिट याचिका क्र.२८५/९९ मधील न्यायनिर्णयाच्या अनुषंगाने नागपूर विभागात आतापर्यंत कार्यवाही पूर्ण होऊन फौजदारी प्रकिया संहिता प्रक्रिया कलम क्रमांक-१०७,१०९,११०,११६ व ११७ नुसार क्षुल्लक गुन्हयामध्ये कारागृहात बंदीस्त असलेल्या एकूण ११२ गुन्हेगारांना सोडण्यांत आल्याचे आयुक्त,नागपूर विभाग,नागपूर यांच्या अर्धशासकीय पत्र क्रमांक-साप्रशा/कार्या-३(४)/कावि/१००८/२००० दिनांक २२.५.२००० अन्वये शासनास कळविण्यांत आले आहे. या संदर्भात म.उच्च न्यायालयाच्या आदेशांची अंमलबजावणी राज्य शासनाच्या नागपूर व्यतिरिक्त उर्वरित भागातही करण्याच्या दृष्टीने सूचना देण्याचा शासनाचा विचार चालू होता.

**परिपत्रक**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार पुढीलप्रमाणे सूचना देण्यांत येत आहेत :-

फौजदारी प्रक्रिया संहिता कलम क्र.१०७,१०९,११०,११६,११७ नुसार क्षुल्लक गुन्हयामुळे कारागृहात बंदीस्त असलेल्या न्यायाधीन बंद्यांना जामीन वा जात मुचलक्यावर सोडण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करण्यांत यावी.

उपरोक्त सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यांत येत यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(ब.ल.गवई)
उप सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग

प्रति,
कारागृह महानिरीक्षक,कारागृह महानिरीक्षणालय,महाराष्ट्र राज्य,पुणे.
कारागृह उपमहानिरीक्षक (मुख्यालय) पुणे/पश्चिम विभाग,पुणे/मध्य विभाग,औरंगाबाद/पूर्व विभाग,नागपूर/दक्षिण विभाग,मुंबई.

सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हा दंडाधिकारी
सर्व अधीक्षक,महाराष्ट्रातील सर्व कारागृहे.
निवडनस्ती.